**सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील “कक्ष अधिकारी” संवर्गातील एक पद “अवर सचिव” या संवर्गात श्रेणीवर्धित करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इएसटी-११२३/प्र.क्र.५९/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०२३

**वाचा:-** सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश क्रमांक असप-१२२२/प्र.क्र.११०/का-१४, दिनांक २३.०२.२०२३

**प्रस्तावना :**

सार्वजनिक बांधकाम विभागात कक्ष अधिकारी पदावर कार्यरत असलेल्या श्रीमती मीना सुरेंद्र काळे यांना सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-१, दिनांक २३ फेब्रुवारी २०२३ च्या शासन आदेशान्वये अवर सचिव पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येऊन, त्यांची पदस्थापना याच विभागात करण्यात आली आहे. ते दिनांक २३ फेब्रवारी २०२३ (म.पू.) पासून विभागात रुजू झाले आहेत. त्या दिनांक ३१ मे, २०२३ रोजी सेवानिवृत्त होणार आहेत.

२. शासन निर्णय, सार्वजनिकम बांधकाम विभाग क्रमांक-इएसटी-१११७/प्र.क्र.१३/प्रशासन-२, दिनांक ४ नोव्हेंबर, २०२३ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील २६९ पदांचा सुधारित आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. या विभागासाठी अवर सचिव (अतांत्रिक) संवर्गात ७ पदे मंजूर असून सर्व पदे भरलेली आहेत. कक्ष अधिकारी संवर्गात ३८ मंजूर पदांपैकी ६ पदे रिक्त आहेत. सध्या श्रीमती काळे यांना अवर सचिव पदावर पदस्थापना देण्यासाठी विभागातील कक्ष अधिकाऱ्याचे एक पद अवर सचिव संवर्गात श्रेणी उन्नत करणे आवश्यक आहे. सबब विभागातील कक्ष अधिकाऱ्याचे एक पद अवर सचिव संवर्गात श्रेणीवर्धित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील कक्ष अधिकारी संवर्गातील (वेतन स्तर एस-१७ : रु.४७,६००-१,५१,१००) एक पद अवर सचिव संवर्गात (वेतन स्तर एस-२३ : रु.६७,७००-२,०८,७००) दिनांक २३ फेब्रुवारी २०२३ (म.पू.) पासून दिनांक ३१ मे, २०२३ पर्यंत श्रेणीवर्धित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या श्रेणीवर्धित पदावर श्रीमती मीना सुरेंद्र काळे, अवर सचिव यांना दिनांक २३ फेब्रुवारी, २०२३ (म.पू.) पासून पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. हे श्रेणीवर्धित पद, त्या विभागात अवर सचिव पदावर कार्यरत असेपर्यंतच अस्तित्वात राहिल. त्यानंतर हे पद आपोआप कक्ष अधिकारी पदावर श्रेणी अवनत होईल.

३. याबाबत होणारा खर्च सार्वजनिक बांधकाम विभागाच्या योग्य त्या अर्थसंकल्पिय लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- ७६/२०२३/सेवा-९, दिनांक ६ मार्च, २०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४०३१७०५४८६२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH JAIPRAKASH BARHATE

Digitally signed by DINESH JAIPRAKASH BARHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d2b949400dcd69ca2cd572e2ab1676bbc50eab4961e4bf4b8a6fc3d8b242711e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=375B2A0B3D3C850685CDBDA7427B95DCF37C814A2A1DA11BFDA199A0B7C55447, cn=DINESH JAIPRAKASH BARHATE
Date: 2023.04.03 17:15:02 +05'30'

**( दि. ज. बऱ्हाटे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय, मुंबई.
६. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.) यांचे स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (रस्ते/ बांधकामे ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. यांचे स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई.
९. श्रीमती मीना सु.काळे, अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (रोख शाखा), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. (२ जादा प्रतींसह)
११. कार्यासन (प्रशासन-१/प्रशासन-३/संगणक कक्ष /नोंदणी शाखा) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती/वैयक्तिक नस्ती.